जिल्हा परिषद / पंचायत समिती कार्यालयातील पिण्याच्या पाण्याची टंचाई विषय हाताळणा-या व टँकरची देयके तयार करणा-या कर्मचा-यांसाठी विशेष प्रशिक्षण आयोजित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१९/प्र.क्र. ०३ /पापु १४**
**जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ००१**
दिनांक : १९ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१) शासन पत्र, महसूल व वन विभाग क्रमांक एससीवाय २०१८/प्र.क्र २५१/म-७, दिनांक ०८.०१.२०१९ (बैठकीचे इतिवृत्त)

**प्रस्तावना -**

तहसिल स्तरावर पंचायत समिती कार्यालयातील जी. पी.एस. यंत्रणेद्वारे झालेल्या माहितीच्या आधारे टँकर्सच्या फे-यांची माहिती घेऊन त्याआधारे देयक बनाविणा-या संबंधित कर्मचा-यांना याबाबतचे विशेष प्रशिक्षण आयोजित करण्यास व त्यासंबंधीचा खर्च टंचाई अंतर्गत प्राप्त होणा-या निधी मधून अदा करण्यासंदर्भात मा. मंत्री, मदत व पुनर्वसन यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या मंत्रीमंडळ उप समितीच्या दिनांक ०३.०१.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेऊन त्यास सहमती देण्यात आली. त्यानुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जिल्हा परिषदेच्या पंचायत समिती कार्यालयातील पिण्याच्या पाण्याची टंचाई विषय हाताळणारे पिण्याच्या पाण्याच्या व टँकर्सची देयके तयार करणा-यां संबंधित कर्मचा-यांना पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अंतर्गत नाशिक येथे कार्यरत असलेल्या “मित्रा” ( महाराष्ट्र पर्यावरण अभियांत्रिकी आणि संशोधन संस्था ) या संस्थेत एक दिवसीय प्रशिक्षण आयोजित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रशिक्षणासाठी येणारा खर्च पिण्याच्या पाण्याची टंचाई अंतर्गत उपलब्ध होणा-या निधी मधून अदा करण्यास एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

३. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९२ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ २१८५), ३१, सहाय्यक अनुदाने(वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, मा. मंत्री, (मदत व पुनर्वसन) यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक ०३.०१.२०१९ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ उप समितीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११९१६१७४०९५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R. B. Kumatgi

Digitally signed by R. B. Kumatgi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96d578360190574be078f90f44cde8446df6e461003bf3672f18f9dbab1603da, cn=R. B. Kumatgi
Date: 2019.01.19 16:48:23 +05'30'

**(राजेंद्र कुमटगी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. अपर मुख्य सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, मीत्रा, नाशिक
६. विभागीय आयुक्त, नाशिक
७. जिल्हाधिकारी, नाशिक
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१०.अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
११. पापु १४ (निवडनस्ती)